“मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम” (सर्वसाधारण) योजनेअंतर्गत मार्जिन मनी रकमेचे शासनाचे सहभाग अनुदान वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- योजना-२०२१/प्र.क्र.२४९/उद्योग-७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक ०७ डिसेंबर, २०२१

**संदर्भ:-** १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्र. मऔधो-२०१९/ प्र.क्र. ०६/ उद्योग-२, दिनांक ०७/०३/०१९.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. योजना-२०१९/प्र.क्र. १२१/ उद्योग-७, दिनांक ०१/०८/२०१९.
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१७७/ उद्योग-७, दिनांक ३१/०८/२०१९.
४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक योजना-२०१९/प्र.क्र. २३०/ उद्योग- ७, दिनांक २३/०१/२०२०.
५) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/जिउके/मुरोनिका/ सर्व सा. प्रस्ताव/ २०२०/ ए-७१६, दिनांक १३/०८/२०२१.
६) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र.उसं/ जिउके/ मुरोनिका/सर्व साधारण प्रस्ताव/ २०२१/ ए-९१०, दिनांक ०८/१०/२०२१.
७) अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र.उसं/ मुरोनिका/समाविष्ट मार्जिन म./ २०२१/ ए-१०५९, दिनांक २६/११/२०२१.

**प्रस्तावना:-**

राज्यातील शहरी व ग्रामीण क्षेत्रातील सुशिक्षित युवक-युवतींची वाढती संख्या व उद्योग, व्यवसाय क्षेत्रात राज्यात विविध क्षेत्रात नवीन संधी उपलब्ध होत आहेत. या स्वयंरोजगार व रोजगाराच्या नवीन संधी उपलब्ध होत आहेत. या स्वयंरोजगार व रोजगाराच्या नवीन संधी विचारात घेऊन उद्योजकतेला चालना देणारी व सर्जनशिलतेला कालानुरुप वाव देणारी सर्वसमावेशाक योजना, ‘प्रधानमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम’ (PMEGP) या सद्यस्थितीत कार्यरत असलेल्या या योजनेच्या धर्तीवर, ‘मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम’(CMEGP) ही योजना दिनांक ०१/०८/२०१९ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आलेली आहे. त्यानुसार राज्यातील शहरी व ग्रामीण युवक-युवतींना स्वयंरोजगाराच्या विविध संधी उपलब्ध होण्यासाठी व योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीच्या प्रशासकीय कार्यवाहीसाठी राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय संनियंत्रण समिती गठीत करण्यात आलेल्या आहेत.

२. “मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम” योजनेअंतर्गत राज्यातील युवक-युवतींना स्वयंपूर्ण आत्मनिर्भर बनविण्यासाठी त्यांनी स्वयंरोजगार प्रकल्प स्थापित करण्यासाठी राज्य शासनाकडून

आर्थिक सहाय्य हे अनुदान स्वरुपात राज्य शासनाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून उपलब्ध करुन देण्यात येईल असे राज्याचे औद्योगिक धोरण २०१९ मध्ये नमूद केले आहे. त्यानुसार सदर योजनेसाठी सर्वसाधारण घटक व आदिवासी घटकांसाठी नवीन लेखाशिर्ष शासन निर्णय दिनांक २३/०१/२०२० अन्वये उघडण्यात आले आहे. तसेच अनुसूचित जाती उपयोजना यासाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांच्याकडून उद्दिष्टांच्या प्रमाणानुसार तरतुद उपलब्ध करून देण्यात येते.

३. सदर योजनेची अंमलबजावणी पूर्णत: ऑनलाईन पद्धतीने उद्योग विभागाच्या अधिपत्याखालील उद्योग संचालनालयाद्वारे जिल्हा उद्योग केंद्रे व खादी ग्रामोद्योग मंडळ यांच्यामार्फत जिल्हा स्तरावर करण्यात येत आहे. त्यानुसार सदर योजनेंतगत सर्वसाधारण प्रवर्गातील ४०० अनुदान दावे मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम पोर्टलवर प्राप्त झाले असून त्याकरीता आवश्यक मार्जिन मनी रक्कम रुपये १८.२५ कोटी बिडीएस प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यासाठी अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांनी त्यांच्या दिनांक १३/०८/२०२१ च्या पत्रान्वये विनंती केली आहे. त्याअनुषंगाने उक्त नमूद सर्वसाधारण प्रवर्गातील अनुदान दाव्यांकरीता आवश्यक मार्जिन मनी रक्कम मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य शासनाच्या मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (CMEGP) या योजनेअंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गातील ४०० अनुदान दावे मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम पोर्टलवर प्राप्त झाले असून त्याकरीता आवश्यक मार्जिन मनी रक्कम रुपये १८.२५ कोटी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव उद्योग संचालनालयाने दिनांक १३/०८/२०२१ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. सदर योजनेअंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गातील उक्त मंजूर प्रकरणात समाविष्ट मार्जिन मनी रकमेचे राज्य शासनाचे सहभाग अनुदान रुपये १८,२५,००,०००/- (रुपये अठरा कोटी पंच्चेविस लक्ष फक्त) प्रस्तुत योजनेतील तरतूदीनुसार वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम आहरण व संवितरण करावयाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात येत आहेत.

३. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. अर्थसं २०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३ , दि.२४/०६/२०२१ व त्यासोबतचे परिशिष्टातील तरतुदीनुसार तसेच त्याअनुषंगाने उद्योग संचालनालयाकडून प्राप्त दिनांक २६/११/२०२१ च्या पत्रानुसार असे प्रमाणित करण्यात येते की, मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रमाची राज्यामध्ये अंमलबजावणी करणेबाबत शासन निर्णय दिनांक ०१/०८/२०१९ अन्वये

शासन निर्णय निर्गमित करण्यात आला असून यामध्ये अर्ज प्रक्रिया व प्रकल्प मंजूरी अंतर्गत करावयाची कार्यवाही, योजनेची अंमलबजावणी यंत्रणा, अनुदान वितरण व विविध मंजूरीस्तव समिती यांची माहिती दिलेली आहे. यापूर्वी सदर योजनेअंतर्गत प्राप्त झालेला निधी प्राधिकृत बँकेत जमा करण्यात येऊन सदर निधी बँकेमार्फत लाभार्थ्यांच्या खात्यात जमा करण्यात येत आहे. पासबूकमधील नोंदीनुसार ७५ टक्केपेक्षा अधिक निधीचे वितरण झालेले आहे. यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक/ महालेखापाल यांच्याकडून कोणतेही आक्षेप नाहीत. सदर निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे.

४. सदर योजनेसाठी होणारा खर्च सर्वसाधारण घटकासाठी मागणी क्रमांक - के ७ - २८५१ ग्रामोद्योग व लघु उद्योग, १०२ लघु उद्योग, (००) (२५) मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (CMEGP) (२८५१६६४५) ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ , दिनांक ०६/०४/२०२१, दिनांक २४/०६/२०२१, दिनांक २९/०७/२०२१ व त्यासोबतच्या परिशिष्टातील तरतुदीनुसार तसेच नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.१०७, दिनांक २६/०८/२०२१ व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. २४४/२०२१/व्यय-१६, दिनांक २९/११/२०२१ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११२०७१६५८२१९३१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRY, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2021.12.21 17:49:54 +05'30'

**( संजय देगांवकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई - ३२.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र उद्योग विकास महामंडळ, मुंबई -३२.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई -३२.
४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघू उद्योग विकास महामंडळ, मुंबई -३२.
५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
८) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
९) सर्व विभागीय उद्योग सह संचालक.
१०) सर्व महाव्यवस्थापक जिल्हा उद्योग केंद्र.
११) वित्त विभाग (व्यय-१६), मंत्रालय, मुंबई -३२.
१२) नियोजन विभाग (का-१४६१), मंत्रालय, मुंबई - ३२.
१३) अवर सचिव (प्रशासन- १), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१४) निवडनस्ती (उद्योग-७).